दुर्बिण दगड खरेदी व निधी वितरीत करण्यास मंजूरी देण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः राभूअ २०१४/प्र.क्र.१३३ /ल-१**

**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**

**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**

दिनांक : **१० सप्टेंबर, २०१४**

वाचा

1) **शासन निर्णय, क्रमांकः महसूल व वन विभाग, क्रमांक राभूअ २०१४/प्र.क्र.१३३ /ल-१, दि. २३.७.२०१४.**
2) **शासन निर्णय, क्रमांकः वित्त विभाग, क्रमांक पूरक-२०१४/प्र.क्र.११२/ अर्थसंकल्प-३, दि. ०४.०७.२०१४.**

प्रस्तावना

महाराष्ट्र जमीन महसूल अधिनियम १९६६चे कलम १२२ व १२६ अन्वये नगर भूमापन मोजणी करण्यात येते. मोजणी कामामध्ये अचुकता साध्य करण्यासाठी मोजणी यंत्र-प्लेन टेबल/इलेक्ट्रॉनिक टोटल स्टेशन( इ.टी.एस.) ठेवण्याकरीता दुर्बिण दगड स्थापित करणे आवश्यक आहे. भूमि अभिलेख विभागाकडून राज्यातील प्रत्येक तालुक्यातील २००० लोकसंख्येवरील १ गाव याप्रमाणे गावाच्या गावठाणाचे भूमापनाचे काम सुरु आहे. सदर भूमापन कामाकरीता दुर्बिण दगड खरेदी करण्यासाठी संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयानुसार रु.२,३६,१३,०४०/- इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

शासन निर्णय

राज्यातील गावठाणांच्या भूमापन कामाकरीता दुर्बिण दगड खरेदीसाठी भूमि अभिलेख विभागातील पुणे, कोकण, नाशिक, औरंगाबाद, अमरावती व नागपूर या विभागांसाठी एकूण रुपये २५,००,०००/- इतका निधी सन २०१४ च्या पावसाळी अधिवेशनात पुरवणी मागणीव्दारे मंजूर करण्यात आला आहे. सदर निधीतील ६०% तरतुद वितरीत करण्यास वित्त विभागाने मान्यता दिली आहे. त्यानुसार उपसंचालक, पुणे, कोकण, नाशिक, औरंगाबाद, अमरावती व नागपूर प्रदेश भूमि अभिलेख विभाग यांच्या अधिपत्याखालील विभागांसाठी दुर्बिण दगड खरेदीस व त्यासाठी प्रत्येकी रु. २,५०,०००/-(रुपये दोन लाख

पन्नास हजार फक्त) याप्रमाणे उपरोक्त ६ विभागासाठी एकूण रुपये १५,००,०००/- (रुपये पंधरा लाख फक्त) वितरीत करण्यास शासन मान्यता देत आहे.

२. या प्रयोजनासाठी जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर निधीच्या विनियोगासाठी स्वतंत्र लेखे ठेवावेत तसेच खर्चाचा ताळमेळ महालेखापालांकडे वेळोवेळी देण्याची दक्षता घ्यावी.

३. यासाठी होणारा खर्च " मागणी क्र.सी - १, २०२९ जमीन महसूल १०२ (०३) नगर भूमापन कामावरील वसुलीयोग्य खर्च (२०२९०३७८) (१३) कार्यालयीन खर्च" या योजनेतर लेखाशीर्षाखाली सन २०१४ च्या पावसाळी अधिवेशनात पुरवणी मागणीव्दारे मंजूर झालेल्या निधीतून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २१९/२०१४/व्यय १०, दिनांक ०६.०८.२०१४ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९१२१३०६३७९२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vidya Hemant Waghmare

Digitally signed by Vidya Hemant Waghmare
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vidya Hemant Waghmare
Date: 2014.09.12 13:02:36 +05'30'

**( विद्या वाघमारे )**

**कार्यासन अधिकारी, महसूल व वन विभाग**

प्रत,

**१) अपर मुख्य सचिव (वित्त)वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई**

**२) जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (म.राज्य) पुणे**

**३) उपसंचालक, पुणे, कोकण, नाशिक, औरंगाबाद, अमरावती व नागपूर प्रदेश भूमि अभिलेख विभाग**

**४) महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा) मुंबई**

**५) महालेखापाल, महाराष्ट्र - २ (लेखा अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा) नागपूर**

६) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

७) कक्ष अधिकारी, वित्त विभाग, व्यय १०/अर्थ ६, वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई

८) कक्ष अधिकारी, कार्यासन ब १/ब २, महसूल व वन विभाग

९) कार्यासन ल १, महसूल व वन विभाग( निवड नस्ती)